महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाची स्थापना-
मंत्रालयीन स्तरावर पदे निर्माण करण्यासाठी
आकस्मिकता निधीतून घेतलेल्या अग्रिमानुसार
उपलब्ध झालेले अनुदान नियंत्रण अधिका-याकडे
सुपूर्द करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:- मप्रन्या-१०८९/सीआर-२८/१६-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

दिनांक:- ३ ऑक्टोबर, १९८९.

वाचा:- शासन निर्णय क्रमांक:- मप्रन्या-१०८९/सीआर-२८/१६-अ,
दिनांक १८.७.८९

<u>शासन निर्णय</u>:- महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाचे संदर्भात मंत्रालयीन स्तरावर लागणा-या कर्मचारी वर्गाच्या वेतनादी खर्चाची तरतूद १९८९-९० च्या अंदाजपत्रकात करण्यात आलेली नाही. त्यामुळे अधिवेशनापर्यंत लागणारा खर्च भागविण्यासाठी शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक- आकनि-११८९/५०/ अर्थसंकल्प-१३, दिनांक १५.७.१९८९ अन्वये रुपये ६२,०००/- [ रुपये बासष्ट हजार फक्त] ची आगाऊ रक्कम आकस्मिकता निधीतून मंजूर करण्यात आली होती. व ती उप सचिव ,सामान्य प्रशासन विभाग [आस्थापना] यांच्याकडे सुपूर्द करण्यात आली होती. परंतु काही प्रशासकीय व अन्य अडचणीमुळे सदर न्यायाधिकरण सुरु झालेले नसल्यामुळे न्यायाधिकरणाचे मंत्रालयीन स्तरावरील कामही सुरु करण्यात आलेले नाही. या परिस्थितीमुळे शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- आकनि-११८९/५०/अर्थसंकल्प-१३ , दिनांक १९.९.८९ अन्वये आकस्मिकता निधी अग्रिम रुपये ६२,०००/- हा वित्त विभागाच्या सहमतीने कमी करून रुपये २४,९७१/- इतका करण्यात आला आहे. त्यामुळे न्यायाधिकरणाच्या मंत्रालयीन स्तरावरील लागणा-या कर्मचा-यांच्या वेतनादी खर्चासाठी रुपये २४,९७१/- चे सुधारीत अनुदान उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग [आस्थापना] यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

२. वरील अग्रिमातून होणारा खर्च मागणी क्रमांक " ए-७-२०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा - [०९०] सचिवालय [१] सामान्य प्रशासन विभाग" या लेखाशीर्षाखाली दाखविण्यात यावा व तो शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक- आकनि-११८९/५०/अर्थसंकल्प - १३, दिनांक १९.९.८९ अन्वये मंजूर करण्यात आलेल्या आकस्मिक निधीतील रुपये २४,९७१/- [रुपये चोवीस हजार नऊशे एकाहत्तर]

क.मा.प.

च्या अग्रिमातून भागविण्यात यावा. या अग्रिमाची व उर्वरित खर्चाची [ जुलै १९८९ ते फेब्रुवारी १९९० ] पूरक मागणी सादर करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
महालेखापाल [ लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र राज्य-१ , मुंबई,
महालेखापाल [ लेखा व अनुज्ञेयता] महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
महालेखापाल [ लेखा परीक्षा] महाराष्ट्र राज्य- १, मुंबई,
महालेखापाल [लेखा परीक्षा] महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग [कार्यासन क्रमांक-अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-१३, व व्यय-४],
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग [आस्थापना],
सामान्य प्रशासन विभाग[कार्यासन क्रमांक २५, २६ व १९],
सह संचालक, लेखा व कोषागारे , संगणक कक्ष,
नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, [दोन प्रती].